वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०१७-१८ मध्ये मान्यता दिलेल्या वाशिम जिल्ह्यातील कामांकरीता आवश्यक निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात उपलब्ध तरतुदीमधून वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागाव वर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः तांसुयो-२०१९/प्र.क्र.८९६/विजाभज-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.**
**दिनांक: ०६ नोव्हेंबर, २०१९.**

**वाचा** - १) शासन निर्णय सामाजिक न्याय,सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्रमांकः- इमाव-२००३/ प्र.क्र. २०५/ मावक-३, दि. ०७ जून, २००३.
२) शासन निर्णय, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग क्रमांक तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/विजाभज-१, दि.३० जानेवारी, २०१८.
३) शासन निर्णय विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग क्रमांकः तांसुयो-२०१७/प्र.क्र.२१/विजाभज-१, दिनांक ९ मार्च, २०१८.
४) जिल्हाधिकारी, वाशिम तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार समिती यांचे पत्र क्रमांक-सआसक/वा/तांसुयो/निधीमागणी/२०१९-२०/२५७७, दि.७/०९/२०१९.

**प्रस्तावना** -

डिसेंबर, २०१७ च्या हिवाळी अधिवेशनात वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत वाशिम जिल्ह्याकरीता रु.५.०० कोटी इतक्या रकमेच्या पुरवणी मागणीचा प्रस्ताव मान्य करण्यात आलेला होता. वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीनुसार संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रु.५.०० कोटी इतक्या रकमेच्या ५८ कामांकरीता रु.२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला होता. उर्वरित रु.३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये विनंती करण्यात आलेली आहे. परंतु डिसेंबर, २०१७ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी मार्च-२०१८ मध्ये व्यपगत झालेला असल्याने संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार रु.३.०० कोटी इतका निधी वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०१९-२० मध्ये उपलब्ध तरतुदीमधून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयांन्वये वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०१७-१८ मध्ये मान्यता दिलेल्या वाशिम जिल्ह्यातील कामांकरीता रु.२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला असून उर्वरित रु.३.०० कोटी इतका निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१९-२० या वित्तीय वर्षात "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो या योजनेंतर्गत प्राप्त अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरचा निधी वितरीत करण्यासाठी सहसचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, वाशिम यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शास निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेला निधी संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या कामांकरीताच खर्च करण्यात येईल याची खबरदारी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, वाशिम यांनी घ्यावी.

५. सदरहू शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६२/का-१४१३, दि.१/१०/२०१९ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५८३/२०१९/व्यय-१४, दि.९/१०/२०१९ अन्वये देण्यात आलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९११०७१५५६२५३९२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.11.07 15:58:28 +05'30'

**(भा.र.गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा / वस्ती सुधार योजनेची जिल्हास्तरीय समिती ,वाशिम
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम
४. संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, पुणे
५. प्रादेशिक उपआयुक्त, समाज कल्याण, अमरावती.
६. सहायक आयुक्त, समाज कल्याण, वाशिम.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, वाशिम.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
११. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उप सचिव (का-१४११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (व्यय-१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व सहसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. प्रधान सचिव, इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, विजाभज-२